सिंधुदुर्ग जिल्हयातील १८ गावे, वेंगुर्ला शहर व मार्गस्थ औद्योगिक क्षेत्र तसेच पर्यटन स्थळांसाठी तिल्लारी प्रकल्पावर आधारित पाणी योजनेस निधी वितरणाबाबत....
(लेखाशीर्ष २२१५ ए०३२)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः तिल्लारी- २०२१/प्र.क्र.१२४ /पापु-१३**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**तारीख: ०२ नोव्हेंबर, २०२१.**

वाचा

१) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-१४०९/प्र.क्र.१४८/पापु-०६, दि. ०१.०६.२०११
२) शासन निर्णय क्रमांक: ग्रापापु-१४१८/प्र.क्र.९४/पापु-०६, दि. २८.०३.२०१९
३) संचालक (वित्त) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर यांचे पत्र क्र. वित्त-२/निधी शाखा/ तिलारी/६५ दि. ०६.०७.२०२१

प्रस्तावना -

सिंधुदुर्ग जिल्हयातील तिल्लारी प्रकल्पावर आधारित १८ गावे, वेंगुर्ला शहर व मार्गस्थ औद्योगिक क्षेत्र तसेच पर्यटन स्थळांसाठी पाणी पुरवठा योजनेस दि. ०१.०६.२०११ च्या शासन निर्णयाअन्वये रु. २१६.३७ कोटी (ढोबळ) इतक्या किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर प्रकल्पातील मे. उत्तम स्टील यांना वगळण्यात आल्याने दि. २८.०३.२०१९ च्या शासन निर्णयाअन्वये तिल्लारी प्रकल्पावर उर्वरित खर्च रु. १५९.४० कोटी इतका खर्च करण्यास लेखाशीर्ष २२१५ ए ०३२ अंतर्गत मान्यता देण्यात आलेली आहे. वित्तीय वर्ष २०२१-२०२२ करीता तिल्लारी प्रकल्पावर आधारित पाणी पुरवठा योजनेकरीता लेखाशीर्ष २२१५ ए ०३२ अंतर्गत रु. १००.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीपैकी ५०% प्रमाणात रु. ५०.०० कोटी इतका निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पिय अंदाज, वितरण व संनियंत्रण प्रणालीवर (BEAMS) उपलब्ध करुन दिला आहे. संचालक (वित्त) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर यांनी तिल्लारी प्रकल्पावर आधारित पाणी पुरवठा योजनेच्या कामांचे प्रलंबित देयके अदा करण्यासाठी रु. १५.२७ कोटी (अक्षरी- रुपये पंधरा कोटी सत्तावीस लाख फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. यास्तव, तिल्लारी प्रकल्पाकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण रु. १५.२७ कोटी (अक्षरी- रुपये पंधरा कोटी सत्तावीस लाख फक्त) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

सिंधुदुर्ग जिल्हयातील तिल्लारी प्रकल्पावर आधारित १८ गावे, वेंगुर्ला शहर व मार्गस्थ औद्योगिक क्षेत्र तसेच पर्यटन स्थळांसाठी तिल्लारी प्रकल्पावर आधारित महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिंधुदुर्ग कार्यालयास मागणीनुसार रु. १५.२७ कोटी (अक्षरी- रुपये पंधरा कोटी सत्तावीस लाख फक्त) इतका निधी संदर्भिय क्र. १ व २ मधील शासन निर्णयात नमूद करण्यात आलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून मंजूर व अर्थसंकल्पिय वितरण व संनियंत्रण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांना वितरीत करण्यात आलेला निधी रु. १५.२७ कोटी (अक्षरी- रुपये पंधरा कोटी सत्तावीस लाख फक्त) बाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, संचालक (वित्त) (श्री. राजेंद्र मडके) यांच्या स्वाक्षरीने तयार केलेले व उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री. वसंत माने) यांनी प्रतिस्वाक्षरीत केलेले देयक अधीदान व लेखाधिकारी कार्यालय, मुंबई यांना सादर करण्यात यावे. महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), (श्री. राजेंद्र मडके) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच उप सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री. वसंत माने ) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम एनईफटी प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. या योजनेवर होणारा खर्च सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षामध्ये मागणी क्र. वाय-०२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषदांना सहाय्य, (०२) जिल्हा परिषदांना अनुदाने (०२)(०२) तिल्लारी प्रकल्पावर आधारित पाणी पुरवठा योजना लेखाशीर्ष (२२१५ ए०३२) , ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा .

०४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१ नुसार या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

०३. हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ. संदर्भ क्र. ३५८/व्यय-३ दि. १८.१०.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११०११६४६२३३९२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANUSHKA ANIRUDH DALVI

Digitally signed by ANUSHKA ANIRUDH DALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5edd45c6e1357ae0c8533741733e53bdac703b68fe52733dbcffe2914e0ac003, pseudonym=788F41926BA617FC3320DC8952A519D487C674CD, serialNumber=73F1FB9D6CBC3DAFBAD56FB8AD850EDE51730924E3CF0C7CD07F0DACC65316C5, cn=ANUSHKA ANIRUDH DALVI
Date: 2021.11.02 12:01:10 +05'30'

**( अनुष्का दळवी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग , मंत्रालय, मुंबई.
४. मा. अपर मुख्य सचिव नियोजन विभाग , मंत्रालय, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र -१ मुंबई/२-नागपूर,
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

७. विभागीय आयुक्त , कोकण विभाग, बेलापूर , नवी मुंबई.
८. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग
१०. अधिक्षक अभियंता/ कार्यकारी अभियंता ,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिंधुदुर्ग
१२. मुख्य अभियंता तथा वि.का.अ.पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
१३. निवडनस्ती पापु-१३, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.